**शिवछत्रपती क्रीडा संकुल, म्हाळुंगे-बालेवाडी, पुणे येथील ऑलिंपिक भवन इमारत बांधकामासाठी निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः क्रीडासू - ३०२०/प्र.क्र. ४३/क्रीयुसे-१,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २७ मार्च, २०२०.

**वाचा :-**

शासन निर्णय, क्रीडासू- ३०२०/ प्र.क्र. ३५/क्रीयुसे-१, दिनांक २७ मार्च, २०२०.

**प्रस्तावना :-**

मा.उपमुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांच्या अध्यक्षतेखाली दि. २६ जानेवारी २०२० रोजीच्या बैठकीत शिवछत्रपती क्रीडा संकुलातील जागेमध्ये ऑलंपिक भवन उभारणी करण्याबाबत सूचित केले होते. त्यानुसार, सार्वजनिक बांधकाम विभागामार्फ़त ऑलंपिक भवन इमारतीचे बांधकामासाठी अंदाजपत्रक व आराखडे तयार करण्यात आले. शिवछत्रपती क्रीडा संकुल, म्हाळुंगे- बालेवाडी, जिल्हा-पुणे येथील क्रीडा संकुलात ऑलिम्पिक भवनच्या बांधकामाच्या रू. ४४.७० कोटी इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास संदर्भाधीन शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे.

सदरहू ऑलिंपिक भवन इमारतीच्या बांधकामाकरीता, फेब्रुवारी-मार्च २०२० च्या अर्थसंकल्पिय अधिवेशनात, मागणी क्रमांक ई-३, प्रधान लेखाशीर्ष २२०४, क्रीडा व युवक सेवा, १०४, क्रीडा व खेळ, (१६) (०२) क्रीडा संकुलांची स्थापना, (२२०४ १८२७), ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशीर्षाखाली रु. १५.०० लक्ष (रुपये पंधरा लक्ष ) ची पुरवणी मागणी मान्य करण्यात आली आहे.

त्यानुसार, पुरवणी मागणीद्वारे उपलब्ध करुन देण्यात आलेला रु. १५.०० लक्ष (रुपये पंधरा लक्ष) इतका निधी वितरणासाठी अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर (बीडीएस) उपलब्ध करुन निधी वितरीत करण्याची बाब विचाराधीन होती .

**शासन निर्णय**

शिवछत्रपती क्रीडा संकुल, म्हाळुंगे- बालेवाडी, जिल्हा-पुणे येथील क्रीडा संकुलात ऑलिम्पिक भवनच्या बांधकामाकरीता रू. ४४.७० कोटी इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. सदर बांधकामाकरीता, **येणाऱ्या खर्चाकरीता** मागणी क्रमांक ई-३, प्रधान लेखाशीर्ष २२०४, क्रीडा व युवक सेवा, १०४, क्रीडा व खेळ, (१६) (०२) क्रीडा संकुलांची स्थापना, (२२०४ १८२७), ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली उपलब्ध तरतूदीतून रु. १५.०० लक्ष (रुपये पंधरा लक्ष) इतकी तरतूद वितरीत करण्यास व आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या अधिनस्त ठेवण्यास शासन या आदेशाद्वारे मान्यता देत आहे.

२. सदर निधी ज्या प्रयोजनाकरिता / बाबींकरिता मंजूर केला आहे. त्याच बाबींकरिता खर्च करण्यात यावा.

३. सन २०१९-२० मध्ये क्रीडा संकुलांची स्थापना याकरीता अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या तरतुदी मधून सदर निधी वितरीत करण्यात यावा.

I. उपरोक्त निधी आवश्यकतेनुसार मान्य निकषानुसार खर्च करण्यात यावा. ज्यावेळेस निधी प्रत्यक्ष खर्च करावयाचा त्याच वेळी आंहरीत करावा. शासन लेख्याबाहेर बँक खात्यात हा निधी ठेवू नये.

II. राज्य शासनामार्फत वेळोवेळी वित्त विषयक निर्गमित करण्यात आलेले विविध आदेश/नियम/ शासन निर्णय वित्तीय नियमावली यांची अंमलबजावणी करुन वरील वितरीत तरतूदीचा विनियोग करण्याच्या अधीन राहून सदर तरतूद वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

४. उपरोक्त संदर्भात होणारा खर्च मागणी क्रमांक ई-३, प्रधान लेखाशीर्ष २२०४, क्रीडा व युवक सेवा, १०४, क्रीडा व खेळ, (१६) (०२) क्रीडा संकुलांची स्थापना, (२२०४ १८२७), ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशीर्षाखालील या वर्षाच्या उपलब्ध तरतूदीतून करण्यात यावा.

५. वित्त विभाग दिनांक ११/३/२०२० व दिनाक १३/३/२०२० च्या परिपत्रकातील सूचनानुसार उपरोक्त तरतुद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी व आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

६. लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांनी सदर निधी आहरीत करुन, शिवछत्रपती क्रीडा संकूल, म्हाळुगे-बालेवाडी, जिल्हा पुणे यांचे खातेमध्ये जमा करावे. व याबाबत शासनाचे पुढील आदेश प्राप्त झाल्यावर, त्यानुसार आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांनी पुढील आवश्यक ती कार्यवाही करावी.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३२७१३४५०२२४२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

*महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.*

Swati Madhukar Nanal

Digitally signed by Swati Madhukar Nanal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=82e1d6f07c5cabf5884958ee70015d36b35b2c07e9700fe62cba2439a81b4be4, cn=Swati Madhukar Nanal
Date: 2020.03.27 16:29:21 +05'30'

**( स्वा.म. नानल )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे स्वीय सहायक, मुंबई.

२. मा.मंत्री, क्रीडा व युवक कल्याण यांचे स्वीय सहायक,
३. मा. राज्यमंत्री , क्रीडा व युवक कल्याण यांचे स्वीय सहायक,
४. मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा / विधानपरिषद)
५. सर्व विधानसभा / विधानपरिषद सदस्य
६. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
७. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे,
८. सर्व जिल्हाधिकारी (क्रीडा संचालनालयामार्फत)
९. सर्व उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा (क्रीडा संचालनालयामार्फत)
१०.महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर,
११.महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर
१२.अधिदान व लेखाधिकारी, मुंबई. (क्रीडा संचालनालयामार्फत)
१३.सर्व संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी ( क्रीडा संचालनालयामार्फत)
१४.वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे. ( क्रीडा संचालनालयामार्फत)
१५.सर्व जिल्हा क्रीडा अधिकारी ( क्रीडा संचालनालयामार्फत)
१६.वित्त विभाग (व्यय-५)/अर्थ-८/नियोजन विभाग (का.१४७१), मंत्रालय, मुंबई,
१७.कार्यासन अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१८. निवड नस्ती (क्रीयुसे-१)